**कृषी विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध केंद्र व राज्य योजनांतर्गत अनुदानावर वाटप करावयाच्या कृषी निविष्ठांसंदर्भात थेट लाभ हस्तांतरण (DBT) योजना राबविणे.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७ - अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-१९ एप्रिल, २०१७

वाचा:-१. शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र.डीसीटी २३१६/प्र.क्र.१३३/का-१४१७, दिनांक: - ५/१२/२०१६.

२. शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग, क्र.सुकृऔ-२०१६/प्र.क्र.३०१/११- अे, दिनांक :- २१ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना**:-

शासनाद्वारे राबविण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य पुरस्कृत विविध कल्याणकारी योजनांतर्गत, लाभार्थींना देण्यात येणारे अनुदान, वस्तू स्वरुपात न देता सदर अनुदान लाभार्थ्यांना थेट लाभ हस्तांतरण (Direct Benefit Transfer) पध्दतीने लाभार्थ्यांच्या बँक खात्यात रोख स्वरूपात देण्याचा धोरणात्मक निर्णय, राज्य शासनाने नियोजन विभागाच्या दिनांक ०५/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेतलेला आहे.

नियोजन विभागाच्या सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने, कृषी विभागाद्वारे राबविण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य पुरस्कृत विविध योजनांतर्गत, अनुदानावर वाटप करावयाच्या कृषी औजारांसंदर्भात अनुदानांचा लाभ थेट लाभ हस्तांतरण योजनेच्या ( DBT ) माध्यमातून लाभार्थ्यांच्या बँक खात्यात रोख स्वरूपात देण्याचा निर्णय, संदर्भात नमूद दिनांक २१ जानेवारी, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये, कृषी विभागाने घेतलेला आहे. त्याच धर्तीवर, केंद्र व राज्य पुरस्कृत विविध योजनांतर्गत, अनुदानावर वाटप करावयाच्या बियाणे, किटकनाशके, सूक्ष्म मूलद्रव्ये,जैविक खते, सूक्ष्म सिंचनाची व सिंचनाची साधने या निविष्ठांच्या संदर्भात, थेट लाभ हस्तांतरण योजना राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर प्रकरणी शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे:-

**शासन निर्णय**:-

कृषी विभागाद्वारे राबविण्यात येणाऱ्या विविध केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत बियाणे, किटकनाशके, सूक्ष्म मूलद्रव्ये, जैविक खते, सूक्ष्म सिंचनाची व सिंचनाची साधने या कृषी निविष्ठांचे वाटप अनुदानावर करण्यात येते. सदर निविष्ठांपैकी, बियाणे, सूक्ष्म मूलद्रव्ये व जैविक खते या तीन निविष्ठांचे उत्पादन व पुरवठा महाबीज, शासकीय संस्था, कृषी विद्यापीठे, कृषी विज्ञान केंद्रं, इत्यादींकडून केले जाणार असल्याने त्याबाबतीत थेट लाभ हस्तांतरण योजनेच्या ( DBT )

माध्यमातून अनुदान देण्याचा प्रश्न उद्भवत नाही. परंतू, **<u>किटकनाशके, सूक्ष्म सिंचनाची व सिंचनाची साधने</u>** या निविष्ठांचा पुरवठा हा वस्तुस्वरूपात करण्याऐवजी सदर कृषी निविष्ठांच्या मूल्याइतकी रोख रक्कम/ अनुदान लाभार्थ्यांच्या बँक खात्यात रोख स्वरूपात जमा करण्यात यावी/यावे. त्यासाठी खालील प्रमाणे कार्यपध्दती विहीत करण्यात येत आहे.

**<u>१. अधिसूचना</u>**:-

कृषी विभागामार्फतच्या कृषी निविष्ठांबाबतच्या वरील थेट लाभ हस्तांतरण योजनेसंदर्भात " **दी आधार (टार्गेटेड डिलिवरी ऑाफ फायनान्सिअल ॲण्ड आदर सबसिडी,बेनिफीट्स ॲण्ड सर्व्हिसेस ) ॲक्ट २०१६** " च्या कलम ७ आणि " **दी आधार (एनरोलमेंट अँड अपडेट) रेग्युलेशन्स २०१६"** च्या नियम १२ प्रमाणे स्वतंत्रपणे अधिसूचना निर्गमित करण्यात येईल.

**<u>२. लाभार्थी निवडीचे निकष</u>**:-

किटकनाशके, सूक्ष्म सिंचनाची व सिंचनाची साधने या कृषी निविष्ठांचा अनुदानावर पुरवठा ज्या योजनेतंर्गत करावयाचा असेल, त्या योजनेच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे लाभार्थी निवडीचे निकष लागू राहतील.

**<u>३. अर्जदाराची ओळख</u>**:-

अर्जदाराची ओळख पटविण्याकरिता, तसेच तो खरोखर शेतकरी आहे, तसेच त्याने दिलेला बँक खाते क्रमांक बरोबर आहे, हे निश्चित करण्याकरिता लाभार्थी शेतकऱ्याने खालील प्रमाणे कागदपत्रांची स्वयंसाक्षांकित प्रत देणे आवश्यक राहील.

अ) शेतकऱ्यांच्या स्वत:चे नावे असलेल्या शेतीच्या क्षेत्राचे ७/१२ व ८- अ चे दाखले.

आ) लाभार्थी अनुसूचित जाती/जमाती या प्रवर्गातील असल्यास त्याबाबत प्राधिकृत अधिकाऱ्यांनी दिलेल्या वैध जात प्रमाणपत्राची प्रत.

इ) आधार ओळखपत्राची प्रत.

ई) अर्जदार शेतकऱ्याने त्याचे बँकेचे खाते आधार क्रमाकांशी जोडून घेणे आवश्यक राहील आणि त्याकरिता त्याने बँकेला दिलेल्या पत्राची व बँकेकडून मिळालेल्या पोहोच पावतीची प्रत.

**४. <u>केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत अनुदानावर पुरवठा करावयाच्या बियाणे, किटकनाशके, सूक्ष्ममूलद्रव्ये, जैविक खते, सूक्ष्म सिंचनाची व सिंचनाची साधने या कृषी निविष्ठांचा दर्जा, गुणवत्ता व तांत्रिक निकष ( विनिर्देशन) ठरविणे</u>** :-

केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत अनुदानावर कृषी निविष्ठांचा पुरवठा करण्याऐवजी,थेट लाभ हस्तांतरण योजनेच्या (DBT) माध्यमातून रोख रक्कम लाभार्थ्यांच्या खात्यात जमा करावयाची असल्याने, निविष्ठांची खरेदी लाभार्थ्यांनी स्वत: खुल्या बाजारातून करावयाची आहे. त्यानुषंगाने, आयुक्त ( कृषी ) यांनी कृषी निविष्ठांचा दर्जा, गुणवत्तेची मानके व तांत्रिक निकष ठरवून द्यावयाचे आहेत. **<u>उदाहरणार्थ</u>** - किटकनाशकाच्या बाबतीत वापरण्यात येणारे किटकनाशक केंद्रिय

किटकनाशक मंडळ (सेंट्रल इन्सेक्टीसाईड बोर्ड - सीआयबी) यांच्याकडे नोंदणीकृत असणे आवश्यक आहे.

म्हणून, अशा कृषी निविष्ठांचा दर्जा व गुणवत्ता, तसेच, तांत्रिक निकष ( विनिर्देशन ) हे केंद्र / राज्य शासनाच्या संबंधित कायद्यान्वये, तसेच, योजनेच्या मार्गदर्शक सूचनांन्वये विहित केलेल्या दर्जाचे, गुणवत्तेचे व विनिर्देशनानुसार असल्याची व जैनेरिक स्वरूपाची असल्याची खात्री, आयुक्त ( कृषी ) यांनी करून, त्याप्रमाणे जाहीर करण्यात यावे, जेणेकरून, त्याबाबतची माहिती संबंधित लाभार्थी, कृषी निविष्ठांचे उत्पादक व विक्रेते यांना सहजरित्या उपलब्ध होईल.

## ५. योजनेंतर्गत अनुदानावर पुरवठा करावयाच्या कृषी निविष्ठांचे मानक मूल्य (Cost Norms) ठरविणे.

विविध योजनांतर्गत पुरवठा करावयाच्या कृषी निविष्ठांकरिता महत्तम अनुदानाची टक्केवारी विहीत करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने अनुदान रकमेची परिगणना करण्यासाठी किटकनाशके, सूक्ष्म सिंचनाची व सिंचनाची साधने यांच्या उत्पादनावर छापण्यात आलेल्या कमाल विक्री किंमती ( MRP) व प्रत्यक्ष विक्री किंमती यापैकी जी कमी असेल ती ग्राह्य धरण्यात यावी.

## ६. थेट लाभ हस्तांतरण पध्दतीने ( DBT ) लाभार्थ्यांच्या बँक खात्यात रोख रकमेचे हस्तांतरण

अ) लाभार्थी ज्या डिलर / विक्रेत्यांकडून कृषी निविष्ठा घेणार आहे, तो वैध डिलर परवाना धारक/ विक्री परवानाधारक व दुकाने व आस्थापना अधिनियमाखालील वैध परवानाधारक असावा.

आ) थेट लाभ हस्तांतरण करण्याकरिता, शासनाने विहीत केलेल्या गुणवत्ता, दर्जा व तांत्रिक निकषापेक्षा (विनिर्देशनापेक्षा), कमी नसलेल्या गुणवत्तेच्या , दर्जाच्या व तांत्रिक निकषांच्या, योजनेतंर्गत मंजूर वरील कृषी निविष्ठा, म्हणजे, किटकनाशके, सूक्ष्म सिंचनाची व सिंचनाची साधने उत्पादक कपंनीच्या कोणत्याही अधिकृत विक्रेत्याकडून विकत घेण्याची मुभा लाभार्थ्यांला राहील.

इ) केंद्र व राज्य पुरस्कृत योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनूसार शासनाने निश्चित केलेल्या व अनुज्ञेय होणा-या अनुदान रकमेपेक्षा अतिरिक्त अनुदान लाभार्थ्यांला देय होणार नाही.

ई) लाभार्थी शेतकऱ्यांनी कृषी निविष्ठांची खरेदी अधिकृत विक्रेत्याकडून कॅशलेस पध्दतीने करावी. त्याकरिता, त्याने त्याच्या आधारक्रमांकाशी निगडीत स्वत:च्या बँक खात्यातून, विक्रेत्याला किंमतीचे प्रदान करावे. म्हणजेच **NEFT, RTGS, IMPS** इत्यादी Electronic Fund Transfer किंवा धनाकर्ष ( डिमांड ड्राफ्ट ) /धनादेशाव्दारे ( चेक ) किंमतीचे प्रदान होणे आवश्यक आहे व त्याचा पुरावा अनुदानाच्या मागणीचा दावा करताना सोबत देणे आवश्यक राहील.

उ) लाभार्थी शेतकऱ्यांनी वरीलप्रमाणे कृषी निविष्ठांची, म्हणजे किटकनाशके, सूक्ष्म सिंचनाची व सिंचनाची साधने, खरेदी केल्यानंतर देयकाची प्रत विक्रेत्याकडून दोन प्रतीत घ्यावी व त्यापैकी एका

देयकाची स्वयंसाक्षांकीत प्रत, कृषी विभागाच्या संबंधित अधिका-याकडे/कार्यालयाकडे ( योजनेतंर्गतच्या मार्गदर्शक सूचनांनुसार लागू असेल त्याप्रमाणे कृषी अधिकारी - पंचायत समिती/ तालुका कृषी आधिकारी /कृषी पर्यवेक्षक ) किंवा प्राधिकृत जनसुविधा केंद्र (Common Services Centre) ची सुविधा उपलब्ध असल्यास, त्याच्यांकडे सादर करावी. यावेळी, त्याची ओळख संगणकावर Bio Metric पध्दतीने नोंदविण्यात येईल. वरील **"ई"** मध्ये नमुद केलेल्या पुराव्या व्यतिरिक्त देयकासह अन्य कोणतेही कागदपत्र सादर करण्याची सूचना लाभार्थ्यांना दिली गेली असल्यास, त्याची प्रतही सादर करणे आवश्यक राहील.

ऊ) शासनाने सूचना दिल्यास काही देयकांची विक्रीकर विभागाकडून सत्यता पडताळणी/ तपासणी करुन घेण्यात येईल. जेणे करुन, खोटया देयकाच्या आधारे अनुदानाची रक्कम मिळविण्यावर नियंत्रण राखणे शक्य होईल .

ए) वरील प्रमाणे कार्यवाही झाल्यानंतर अनुदानाची संपूर्ण रक्कम शेतकऱ्याच्या खात्यावर थेट लाभ हस्तांतरण पध्दतीद्वारे (DBT) पंधरा दिवसाच्या आत जमा करणे संबंधितांवर सेवा हमी कायदयान्वये बंधनकारक राहील. **तत्संबधीची अधिसूचना शासनस्तरावरुन स्वतंत्रपणे काढण्यात येईल**.

ऐ) लाभार्थी स्वत: विक्रेत्याकडून निविष्ठांची खरेदी करणार असल्याने निविष्ठांच्या गुणवत्तेसंदर्भात शासनाची कोणतीही आर्थिक जबाबदारी असणार नाही.

ओ) वर्ष २०१७ -१८ पासून कृषी निविष्ठांची वरीलप्रमाणे खरेदी करणे आर्थिक दृष्टिने दुर्बल शेतकऱ्यांना सोयिस्कर व्हावे याकरीता जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी जिल्हयाच्या पत आराखडयामध्ये योग्य ते उद्दीष्ट व आर्थिक तरतूदीचा समावेश करावा.

औ) आर्थिक वर्ष २०१७-१८ पासून म्हणजेच दिनांक ०१.०४.२०१७ पासून वरीलप्रमाणे योजनेची पूर्णत: अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०४१९११२७२३५३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash R. Kadam
Date: 2017.04.19 11:31:33 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री ( कृषी ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.राज्यमंत्री ( कृषी ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अप्पर मुख्य सचिव (नियोजन),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव ( कृषी ), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) आयुक्त (कृषी) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) कुलगुरु, कृषी विद्यापीठे (सर्व)
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषी उद्योग विकास महामंडळ मर्यादित, गोरेगांव मुंबई -२५
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ ( महाबीज )मर्यादित, अकोला.
१०) व्यवस्थापकीय संचालक , महाराष्ट्र राज्य ,बीज प्रमाणिकरण यंत्रणा, अकोला.
११) कृषी संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) कृषी संचालक, (सर्व) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) विभागीय कृषी सहसंचालक (सर्व)
१४) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
१५) कृषी विकास अधिकारी (सर्व जिल्हा परिषद)
१६) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
१७) महालेखापाल -२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.
१८) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१९) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ( व्यय/अर्थोपाय)
२०) उपसचिव ( २ अे ), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) उपसचिव ( सर्व), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) कक्ष अधिकारी/अवर सचिव /उपसचिव ( सर्व ) ( कृषी ), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई .